Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Sadanand D. Gavas working under Irrigetion Kokan Circle, Ratnagiri

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण-- **श्री. सदानंद डी. गवस, अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी.**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. रुअआ -२००८/ (१०९/२००८)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०१/१०/२०११

**पहावे** :-१) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.४.२००१
२) अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबाव, रत्नागिरी यांचे पत्र क्र : कोपामं/पशा/का-१५/३०४७, दिनाक ३०/५/२००८.

**प्रस्तावना:**

अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गत उपअभीयंता, कर्मशाळा उपविभाग, कोनाळकट्टा येथे श्री. सदानंद दत्ताराम गवस यांना मदतनीस या पदावर रोजंदारी आस्थापनेवर तात्पुरत्या स्वरुपात दि २४.११.१९८३ रोजी नियुक्त करण्यात आले होते. तद्नंतर श्री. गवस हे दि २६.७.८७ पासुन स्वतःहून कामावर गैरहजर राहिल्यामुळे त्यांना दि २२.१२.८८ रोजी नोटीसीद्वारे नुकसान भरपाईची रक्कम देवू करण्यात आली असता, त्यांनी नोटीस तथा रक्कम स्विकारली नाही. यानंतर श्री. गवस यांनी १० वर्षानी त्यांना कामावर पुन्हा हजर करुन घेण्यासाठी मा. कामगार न्यायालय, कोल्हापूर येथे आयडीअे क्र १३/९९ दाखल केला असता, दि. २८.१.२००० रोजी श्री. गवस यांना सेवासातत्यासह पुनःस्थापित करुन दि २२.१२.१९८८ पासून संपूर्ण थकीत वेतन रु. ५००/- या प्रमाणे देण्यात यावे असा निर्णय झाला. सदर निर्णयाविरुध्द संबधित कार्यालयाने रिस्टोरेशन ॲप्लीकेशन मा. कामगार न्यायालय, कोल्हापूर येथे आयडीए क्र ४/२००० दाखल केला. सदर दावा मा. कामगार न्यायालय, रत्नागिरी येथे हस्तांतरीत झाल्यामुळे त्याचा नं १/९९ असा झाला. दि ३१.८.२००४ रोजी श्री. गवस यांना सेवासातत्यासह पुनःस्थापित करुन दि १.१.१९९८ पासून सेवेत पुनःस्थापित करण्याच्या दिनांकापर्यंत वेतनाच्या ५०% वेतन देण्यात यावे असा निर्णय झाला. दरम्यान श्री. गवस यांनी दि. ३१.८.२००४ रोजीच्या निर्णयाची अंमलबजावणी न झाल्यामुळे मा. कामगार न्यायालय, रत्नागिरी येथे फौजदारी दावा क्र १२/२००६ दाखल केला होता. दि. ३१.८.२००४ च्या निर्णयाविरुध्द शासन मान्यतेने वरिष्ठ न्यायालयात अपील दाखल करण्यात आले नाही. त्यामुळे मा. कामगार न्यायालय, रत्नागिरी दि ३१.८.२००४ च्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याकरिता सचिव समितीच्या दि २.१२.२००६ रोजी झालेल्या बैठकीच्या मान्यतेने श्री. सदानंद गवस यांना सेवासातत्यासह पुनःस्थापित करुन दि १.१.१९९८ पासून सेवेत पुनःस्थापित करण्याच्या दिनांकापर्यंत ( दि १५.१२.२००६) वेतनाच्या फरकाची ५०% रककम अदा करण्यात आली . श्री. गवस यांना

सेवासातत्य दिल्यामुळे दि. २४.४.२००१ मधील तरतुदीनुसार त्यांचा प्रथम नियुक्तीचा दिनांक विचारात घेवून त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. सदानंद दत्ताराम गवस त्याच्या प्रथम नियुक्तीच्या दिनांकापासून सलग ५ वर्ष सेवेच्या कालावधीनंतरचा दि. २४.११.१९८८ हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा असल्याने श्री. गवस यांना खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. सदानंद दत्ताराम गवस | रोजंदारी | मदतनीस २४.११.८३ | २४.११.८८ | मदतनीस | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री. सदानंद दत्ताराम गवस यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

४. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास

आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत_शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५. श्री. सदानंद दत्ताराम गवस यांना न्यायालयाने सेवासातत्य दिल्यामुळे त्यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. श्री. गवस यांना न्याय निर्णयानुसार दि. २२.१२.८८ पासून दि. ३१.१२.९७ पर्यंत कोणतीही थकबाकी अनुज्ञेय नाही. त्यांना दि. १.१.९८ पासून दि. १५.१२.२००६ पर्यंत रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील वेतनाच्या फरकाची ५०% रक्कम देय राहील. **सदर रक्कम अदा करण्यापूर्वी सदर कालावधीतील रोजंदारीच्या दराने अदा केलेली रक्कम वजा करण्यात यावी.** उर्वरित संपूर्ण रकमेपैकी दि ३१.८.२००० पर्यंतच्या वेतनाच्या फरकाची थकबाकी (सर्वप्रकारच्या भत्यासहीत ) भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात यावी. सदर रकमेचा पहिला हप्ता सन २०१२-१३ या आर्थिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यात संबंधित कर्मचा-याच्या भविष्यनिर्वाह निधीमध्ये वार्षिक कमाल दहा (१०) हप्त्यामध्ये समान हप्त्यात जमा करावी व प्रत्येक हप्ता भरल्यापासून तीन वर्षापर्यंत सदर रक्कम त्या कर्मचा-यास या खात्यातून कोणत्याही प्रकारच्या अग्रीमाच्या स्वरुपात काढता येणार नाही. दि. १.९.२००० पासुन पुढील वेतन फरकाची रक्कम संबंधित कर्मचा-यास धनादेशाद्वारे (Cheque) अदा करण्यात यावी.

६. परिच्छेद ५ मध्ये नमुद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही तसे संबंधित कर्मचा-यांकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही अशाप्रकारचे प्रतिज्ञापत्र लिहुन घेणे बंधनकारक राहील.

७. सदर सदर प्रस्तावावरील खर्च सन २०११-१२ या आर्थीक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

९.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक :२०१११००११५२३१६००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबतः प्रपत्र ब

अ.अ.कोदे

**( अ. अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र - २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबांव, रत्नागिरी
कार्यकारी अभियंता, तिलारी शिर्षकामे विभाग क्र १, कोनाळकट्टा
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.